# महाराष्ट्र शासन

संकीर्ण-२०११/प्र.क्र. २६/जल-२४
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांकः १५ एप्रिल, २०११.

संदर्भ:- शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२००४/ प्र.क्र.२५/०४/१२, दिनांक २५ मे २००६.

## कार्यालयीन आदेश

संदर्भाधीन शासन अधिसूचनेद्वारा महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकिय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ प्रस्तृत करण्यात आला आहे. सदर अधिनियामाच्या कलम ९ (३) मधील तरतुदीप्रमाणे प्रत्येक विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी विभागाशी/कार्यालयाशी संबंधीत सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्याचे तीन स्तर निर्धारित करुन प्रसिध्द करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने या कार्यासनाशी संबंधीत विषयांच्या बाबतीत सोबतच्या तक्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्याचे निर्देश असल्यास किंवा विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०११०४१५१६१७१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. रा. बारसिंगे )
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान सचिव( जलसंधारण ) यांचे स्वीय सहाय्यक,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व पर्यवेक्षकीय अधिकारी,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने,
अवर सचिव/कार्यासन अधिकारी; आस्था-१,२, ३, रोखशाखा,
निवड नस्ती /जल-२४.

D:\soft\ulhas\Un Started Gustion 2009Speech-2010.lwp

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ९(१) व (३) अंतर्गत कार्यासनाशी संबंधित बाबीचा अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करणे.

| अ.क्र. | विषय | स्तर | | | आदेश/ प्रमाण पत्र/पत्र निर्गमित करण्यास समक्ष अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | अधिवेशन काळात विधानमंडळ सचिवालयाकडून जलसंधारण उपविभागाकडे प्राप्त झालेले विधान सभा/विधान परिषद तारांकित प्रश्न, लक्षवेधी सूचना, अल्पसूचना/ठराव, अनियतदिन प्रस्ताव, विशेष अल्लेख सूचना इ. संबंधीत कार्यासनाकडे पाठवून त्याबाबतचा पाठपुरावा करणे. | अवर सचिव कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव जलसंधारण | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| २ | विधानमंडळ सचिवालयाकडून प्राप्त झालेले विधान सभा / विधान परिषद अतारांकित प्रश्न संबंधीत कार्यासनाकडे पाठवून त्याबाबतचा पाठपुरावा करणे. | अवर सचिव कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव जलसंधारण | अवर सचिव / कक्ष अधिकारी |
| ३ | विधान सभा/विधान परिषद सभागृहात मा.मंत्री महोदयांनी दिलेल्या आश्वासनांची पूर्तता करण्यासाठी संबंधीत कार्यासनांना आश्वासनांच्या प्रती पाठवून त्याबाबत पाठपुरावा करणे. | अवर सचिव कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव जलसंधारण | अवर सचिव / कक्ष अधिकारी |
| ४ | महाराष्ट्र जलसंधारण सल्लगार परिषद यांच्या प्रशासकीय बाबींवर कार्यवाही करणे. | अवरसचिव कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव जलसंधारण | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| ५ | मा. राज्यपालांच्या अभिभाषणावरील चर्चेच्या अनुषंगाने जलसंधारण उपविभाशी संबंधीत आवश्यक माहिती संसदीय कार्य विभागास पाठविणे . | अवर सचिव कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव जलसंधारण | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |
| ६ | मा.वित्तमंत्र्याच्या भाषणावरील चर्चेच्या अनुषंगाने जलसंधारण उपविभागाशी संबंधीत आवश्यक माहिती वित्त विभागास पाठविणे. | अवर सचिव कक्ष अधिकारी | उप सचिव | सचिव जलसंधरण | अवर सचिव/ कक्ष अधिकारी |